शासकीय आदिवासी आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांच्या मंजूर प्रवेश क्षमतेत वाढ करणे तसेच सुधारीत धोरणानुसार प्रवेश नियमावलीत सुसूत्रता आणणेबाबत...

मार्गदर्शक सूचना..

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन परिपत्रक, क्रमांक एएससी-१०९२/प्र.क्र. ३०११/का. १३
मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२.
दिनांक: २० फेब्रुवारी, १९९३.

वाचा:-
१] शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र. बीसीपी-१०७३/३०३५, दिनांक ३ ऑक्टोबर, १९७३
२] शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र. बीसीपी-११७३/२४९९५/५, दिनांक ६ जुलै, १९७४
३] शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र. एएससी-१०८१/का. १५, दिनांक १९ ऑक्टोबर, १९८१
४] शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र. एएससी-१८८२/९९८४५/का. १५, दिनांक १३ मे, १९८२.
५] शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०८५/५४३५/का. १३, दिनांक ९ सप्टेंबर, १९८५
६] शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०८३/३१८०४/का. १५, दिनांक १० मे, १९८४
७] शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०८७/३९३३/[८८९]/का. १३, दिनांक ११ ऑक्टोबर, १९८८
८] शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०८९/३६१२९/का. १३, दिनांक १३ डिसेंबर, १९८९.
९] शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०९२/प्र.क्र. ३०११/का. १३, दिनांक ५ नोव्हेंबर, १९९२.

प्रस्तावना :- भारतीय संविधानाच्या कलम ४६ प्रमाणे शासनावर अनुसूचित जमातीबाबत त्यांच्या शिक्षणाच्या आर्थिक उन्नतीच्या दृष्टीकोनातून खास जबाबदारी टाकण्यात आली आहे. शिक्षणाचे महत्त्व लक्षात घेऊन शासनाने आदिवासींच्या शैक्षणिक व सामाजिक विकासासाठी "आश्रमशाळा समूह" ही योजना सन् १९७२-७३ पासून सुरु केली आहे. सदर योजनेतंर्गत शासन निर्णय क्र. बीसीपी-१०७२/३८९३/जी, दिनांक १४ ऑगस्ट, १९७२ मध्ये नमुद निकषानुसार सुमारे १० ते १५ गांवाच्या गटातील ५ ते ७ हजार लोकसंख्येच्या समूहासाठी एक आश्रमशाळा उघडता येते. अतिदुर्गम भागासाठी हा निकष शिथिल करण्यात आला असून शासन निर्णय क्रमांक एएससी-१०८०/५००२०/का. १५, दिनांक १९. १०. ८२ नुसार २ ते ३ हजार आदिवासी लोकसंख्येसाठी एक आश्रमशाळा उघडता येते. आतापर्यंत राज्यात एकूण ४०६ शासकीय

आश्रमशाळा मंजूर करण्यात आल्या आहेत. या आश्रमशाळा निवासी असून आश्रमशाळांतून प्रवेश दिलेल्या विद्यार्थ्यांना मोफत शिक्षणाव्यतिरिक्त भोजन, निवास, गणवेश, अंथरुण-पांघरुण, शैक्षणिक साहित्य इ. सुविधा मोफत पुरविल्या जातात.

आश्रमशाळांमधून इयत्ता ७ वी उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांच्या माध्यमिक शिक्षणाची सोय करण्यासाठी शासनाने शासकीय आश्रमशाळांची / पोस्ट बेसिक आश्रमशाळांत श्रेणीवाढ करण्याची योजना सन् १९७८-७९ पासून सुरु केली आहे. या योजनेअंतर्गत प्रत्यक्ष गरज लक्षात घेऊन २ आश्रमशाळांमागे एका आश्रमशाळेची पोस्ट बेसिक आश्रमशाळेत श्रेणीवाढ केली जाते. या योजनेतंर्गत आतापर्यंत १८३ शासकीय आदिवासी आश्रमशाळांची पोस्ट बेसिक आश्रमशाळेत श्रेणीवाढ करण्यात आली आहे. आश्रमशाळांप्रमाणेच पोस्ट बेसिक आश्रमशाळा देखील निवासी शाळा आहेत. शासकीय आदिवासी आश्रमशाळा व पोस्ट बेसिक आश्रमशाळांमुळे आदिवासींच्या शैक्षणिक विकासात मोलाची भर पडली असून, इतर शाळांपेक्षा आश्रमशाळांमध्ये प्रवेश घेण्याकडे आदिवासींचा अधिक कल दिसून येतो. म्हणून आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळांच्या प्रवेश क्षमतेत वाढ करण्याचा तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आश्रमशाळेची प्रवेश क्षमता व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील शाळांतील प्रवेश क्षमतेमध्ये असलेली विसंगती काढून टाकून प्रवेश क्षमतेमध्ये सुसूत्रता आणण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>शासन निर्णय</u> :- शासनाने मान्य केलेल्या नविन धोरणानुसार शासकीय आश्रमशाळा प्राधान्याने आदिवासी उपयोजना क्षेत्रात व दुर्गम भागात सुरु करण्यात याव्यात व त्या रस्ता, दळणवळणाची साधने, दवाखाने व पाणी वीज आणि पिठाची गिरणी इत्यादी मूलभूत सोयी असलेल्या व साधारणपणे मध्यवर्ती असलेल्या ठिकाणी उघडाव्यात.

२. प्रचलित धोरणानुसार आदिवासी उपयोजना क्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा व पोस्ट बेसिक आश्रमशाळांमध्ये प्रत्येक वर्गात अनुक्रमे ४० निवासी विद्यार्थी व ५ अनिवासी [बहिस्थ] विद्यार्थ्यांना आतापर्यंत प्रवेश देण्यात येत असे. तर आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळांमध्ये प्रत्येक वर्गात अनुक्रमे ३६ निवासी व ५ अनिवासी मिळून एकूण ४१ विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येत असे. अशा प्रकारे इयत्ता ७ वी पर्यंत वर्ग असलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील एका आश्रमशाळेची एकूण प्रवेश क्षमता ३१५ विद्यार्थी [२८०

आश्रमीय + ३५ डेस्कॉलर] अशी होती. तर पोस्ट बेसिक आश्रमशाळेमध्ये इ. ८ वी ते १० वी या ३ वर्गाची प्रवेशक्षमता १२० आश्रमीय व १५ डेस्कॉलर मिळून १३५ विद्यार्थी अशी होती. तद्वतच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील इ. ७ वी पर्यंतचे वर्ग असलेल्या आश्रमशाळांची एकूण प्रवेशक्षमता २८७ विद्यार्थी [२५२ आश्रमीय व ३५ डेस्कॉलर] अशी होती आणि पोस्ट बेसिक आश्रमशाळांची इ. ८ वी ते १० वी या ३ वर्गातील प्रवेशक्षमता १२३ [१०८ आश्रमीय + १५ अनिवासी] अशी होती. आता शासनाने मान्य केलेल्या नविन धोरणानुसार आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आश्रमशाळा/ पोस्ट बेसिक आश्रमशाळा व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील आश्रमशाळा/ पोस्ट बेसिक आश्रमशाळा यांच्या प्रवेशक्षमतेमध्ये असलेली तफावत दूर करून शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएसटी-१०९२/प्र. क्र. ३०११/ का. १३, दिनांक . नोव्हेंबर, १९९२ अन्वये शासकीय आदिवासी आश्रमशाळा/ पोस्ट बेसिक आश्रमशाळांमध्ये मग त्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील असो व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील असो, प्रत्येक वर्गात ४० आश्रमीय व १० विद्यार्थ्यांना डेस्कॉलर म्हणून प्रवेश देण्यात यावा असे आदेश दिले आहेत.

३. प्रवेश क्षमता व प्रवेशाबाबतचे नविन धोरण :- वरील शासन निर्णयान्वये दिलेल्या आदेशानुसार शासकीय आश्रमशाळा व पोस्ट बेसिक आश्रमशाळांची प्रवेश क्षमता प्रत्येक वर्गात ४० आश्रमीय विद्यार्थी, १० डेस्कॉलर विद्यार्थी याप्रमाणे इ. ७ वी पर्यंतचे वर्ग असलेल्या आश्रमशाळांची प्रवेशक्षमता २८० आश्रमीय विद्यार्थी व ७० डेस्कॉलर मिळून ३५० विद्यार्थी राहील. पोस्ट बेसिक आश्रमशाळांमध्ये [इ. ८ वी ते १० वी या ३ वर्गाची] १२० आश्रमीय विद्यार्थी व ३० डेस्कॉलर, मिळून एकूण प्रवेश क्षमता १५० विद्यार्थी राहील. प्रवेश देताना खालील बाबींचे अनुपालन करावे.

अ] शासकीय आश्रमशाळांमध्ये मुलांमुलींचे प्रवेशाचे प्रमाण ५०:५० असे असावे. तथापि, ज्या ठिकाणी ५०% मुली मिळणार नाहीत वा टक्केवारीचे हे प्रमाण कमी असेल तेथे रिक्त राहणा-या जागी मुलांना प्रवेश द्यावा.

ब] आश्रमीय विद्यार्थी हे आदिवासीच असावेत.

क] वरिष्ठ विद्यार्थ्यांमध्ये दुर्बल/अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे. परंतु त्या गावातील तसेच आदिवासी भागात काम करणा-या कर्मचा-यांची मुले तसेच शाळेतील कर्मचा-यांची मुले, जरी ती बिगर आदिवासी असले तरी प्रत्येक वर्गात कमाल ५ इतक्या मर्यादेच्या अधीन

राहून, त्यांना प्रवेश देता येईल. तथापि, या बहिस्थ विद्यार्थ्यांना शिक्षणाव्यतिरिक्त इतर सवलती अनुज्ञेय राहणार नाहीत.

ड] शासकीय आश्रमशाळांमध्ये फक्त इ. १ ली व ८ वी मध्येच प्रवेश देण्याचे प्रचलित धोरण रद्द करून व इतर वर्गात नविन विद्यार्थी घेण्यावरील बंधने काढून टाकून, शिल्लक आणि उपलब्ध क्षमतेनुसार कोणत्याही वर्गात नविन विद्यार्थी घेण्याची मुभा मुख्याध्यापकांना देण्यात येत आहे. किंबहुना मुख्याध्यापक, प्रकल्प अधिकारी व सहाय्यक प्रकल्प अधिकारी यांनी असे प्रवेश देण्याबाबत स्वत: कामात रस घेऊन आश्रमशाळांची/पोस्ट बेसिक आश्रमशाळांची क्षमता पूर्णपणे वापरली जाईल, याबाबत दक्षता घ्यावी. संबंधित अधिका-यांच्या वार्षिक गोपनीय अहवालात ह्या कामगिरीची नोंद घेण्यात यावी.

इ] इ. २ री ते इ. १० वी ह्या मधल्या इयत्तेत ज्या विद्यार्थ्यास प्रवेश द्यावयाचा असेल त्या विद्यार्थ्याने त्यापूर्वीची इयत्ता ही मान्यता प्राप्त प्राथमिक/माध्यमिक शाळेतून उत्तीर्ण केली असली पाहिजे.

फ] अशा नव्याने प्रवेश दिलेल्या विद्यार्थ्यांची नावे तसेच ते विद्यार्थी पूर्वी कोणत्या शाळेत शिकत होता त्याचा सर्व तपशील संबंधित मुख्याध्यापक/प्रकल्प अधिकारी यांनी संबंधित शिक्षणाधिकारी, जि. प. यांना त्वरीत पाठवावा.

४. आश्रमीय विद्यार्थी व बहिस्थ [डेस्कॉलर] विद्यार्थी यांना द्यावयाच्या सवलती :-

अ] शासकीय आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळांमध्ये आश्रमीय म्हणून प्रवेश देण्यात येणारे सर्व विद्यार्थी आदिवासी असले पाहिजेत. आश्रमीय विद्यार्थ्यांना सकाळचा नाश्ता, दोन वेळचे जेवण, गणवेशाचे दोन संच, निवास, अंथरुण-पांघरुण, पाठ्यपुस्तके, लेखनसाहित्य इ. सुविधा मोफत पुरविण्यात येतील.

ब] शासकीय आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळांत बहिस्थ[डेस्कॉलर] विद्यार्थी म्हणून प्रवेश देण्यात आलेल्या अनुसूचित जमातीचे विद्यार्थी साधारणत: ज्या गावात आश्रमशाळा आहे, त्या गावातील रहिवाशी असल्याने ते स्वत:च्या घरी राहून या आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळातून शिक्षण घेत असतात म्हणून त्यांना मोफत शिक्षणाव्यतिरिक्त फक्त दुपारचे जेवण, गणवेशाचे दोन संच, लेखन साहित्य, पाठ्यपुस्तके इ. सवलती अनुज्ञेय राहतील.

क] आदिवासी भागात काम करणा-या कर्मचा-यांची "डे स्कॉलर" म्हणून प्रवेश दिलेली मुले तसेच आश्रमशाळेतील कर्मचा-यांची मुले ही जरी

५...

आदिवासी असली तरी त्यांना शिक्षणाव्यतिरिक्त इतर कोणतीही सवलत अनुज्ञेय राहणार नाही.

५. **शासकीय आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळांत शिक्षण घेत असताना नापास झालेल्या विद्यार्थ्यांना पुन्हा प्रवेश देण्याबाबत:--**

शासकीय आदिवासी आश्रमशाळांतील/पोस्ट बेसिक आश्रमशाळांतील नापास विद्यार्थ्यांना पुन: प्रवेश देण्याबाबत शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएसटी-१०८९/३६१२९/का.१३, दि. १३ डिसेंबर, १९८९ अन्वये आदेश देण्यात आले आहेत. त्याचा पुनरुच्चार थोडक्यात खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

अ] शासकीय पोस्ट बेसिक आश्रमशाळांतील माध्यमिक शालांत परीक्षेत नापास होणा-या मुला-मुलींना पोस्ट बेसिक आश्रमशाळांत आश्रमीय विद्यार्थी/विद्यार्थीनी म्हणून पुन्हा एकवार प्रवेश देण्याची सवलत शासन निर्णय, दिनांक १० मे, १९८४ अन्वये विहित केलेल्या अटींच्या अधीन राहून चालू ठेवण्यात यावी.

ब] शासकीय आश्रमशाळांमधील [प्राथमिक विभाग] नापास होणा-या मुलींना शासकीय आश्रमशाळेत आश्रमीय विद्यार्थीनी म्हणून पुन्हा एकवार प्रवेशाची सवलत चालू ठेवण्यात यावी.

क] पोस्ट बेसिक आश्रमशाळात ८ वी आणि ९ वी मध्ये नापास झालेल्या मुलींना आश्रमशाळेच्या वसतिगृहात जागा असल्यास अशा विद्यार्थीनींना पुन्हा आश्रमीय विद्यार्थीनी म्हणून एकवार प्रवेश देण्यात यावा. आश्रमीय [होस्टेलर] म्हणून आश्रमशाळेत प्रवेश देणे शक्य नसेल तर अशा मुलींना डेस्कॉलर म्हणून मंजूर संख्येत प्रवेश दयावा.

ड] इ.१ ली ते ९ वी पर्यंत नापास होणा-या मुलांना आश्रमशाळांत/पोस्ट बेसिक आश्रमशाळांत [वसतिगृहात] जागा असल्यासच पुन्हा एकवार त्यांना आश्रमीय विद्यार्थी म्हणून प्रवेश देण्यात यावा. परंतु वसतिगृहात प्रवेश देणे शक्य नसेल तर मंजूर संख्येत डेस्कॉलर म्हणून प्रवेश दयावा.

इ] इ.१ ली ते ९ वी मधील नापास मुलांना व इ.८ वी व ९ वी मधील नापास मुलींना [illegible] आश्रमशाळांत/पोस्ट बेसिक आश्रमशाळांत आश्रमीय विद्यार्थी म्हणून मंजूर संख्येमध्ये डेस्कॉलर म्हणून प्रवेश देणे शक्य [illegible] तर त्यांना आणखी सोय [illegible] लागेल हे संबंधित प्रकल्प अधिकारी, [illegible] एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

६...

यांनी संबंधित विद्यार्थ्यांना/विद्यार्थीनींना स्पष्ट करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ध. सं. छ्हटकर ]

उप सचिव

प्रति,

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी [१४ आदिवासी जिल्हे]
जिल्हाधिकारी व आदिवासी उपायुक्त [१४ आदिवासी जिल्हे]
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ [१४ आदिवासी जिल्हे]
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद [१४ आदिवासी जिल्हे]
शिक्षण व सेवायोजन विभाग/नियोजन विभाग/वित्त विभाग [का. व्यय-११] [अर्थ-३] व [१७] मंत्रालय, मुंबई.
खाजगी सचिव, उपमंत्री/राज्यमंत्री/मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन ६ व ७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यासने, आ. वि. वि.
निवड नस्ती. का. १३.

कारा/